घर बांधणी अग्रिम

शासकीय सेवेत असताना मृत्यू पावलेल्या शासकीय कर्मचा-याला मंजूर झालेल्या रकमेची अदत्त थकबाकी माफ करण्या-संबंधी लेखांकन कार्यपद्धती

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
निर्णय क्रमांक-एचबीए-१०८२/सीआर-४५४/जीईएन-५,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक ४ जून १९८३.

निर्णय

वित्त विभाग क्रमांक-एचबीए-१०७६/सीआर-७६५/जीईएन-५, दिनांक - ५ फेब्रुवारी, १९८१ या शासन निर्णयान्वये काढलेल्या आदेशानुसार "महाराष्ट्र शासन कर्मचारी घरबांधणी अग्रिम नियम, १९६२ आणि महाराष्ट्र राज्य शासकीय कर्मचा-यांच्या सहकारी गृहनिर्माण संस्थांना मंजूर करावयाची वित्तीय सहाय्यकाची योजना" याखाली मंजूर झालेल्या घरबांधणी अग्रिमाचे मुद्दल, सरकारी सेवेत असताना त्याच्या अकाली मृत्यु प्रसंगी नियमाप्रमाणे देय असलेल्या मृत्यु-नि-सेवानिवृत्ती लाभांतून समायोजित करावे. ह्या समायोजनानंतरही थकबाकी शिल्लक राहिली तर, संबंधित प्रशासनिक विभागाने रु. २५,०००/- पर्यंत रक्कम माफ करावी आणि पुढील अदत्त थकबाकी असल्यास, वित्त विभागाच्या सहमतीने माफ करावी.

२. उक्त आदेशानुसार सोडून दिलेल्या मुद्दलाच्या रकमेचे लेखा समायोजन कसे करावे, असा प्रश्न उपस्थित झाला आहे. तेव्हा असा निर्णय घेण्यात आला आहे की, शासन लेख्यात प्रतिनोंद जमा दाखवून ही रक्कम लेख्यातून निर्लेखित करावी. तदनुसार व्यक्तिगत शासकीय नोकरांचे वेतन व भत्ते ज्या शीर्षाखाली खर्ची टाकले जातात, त्या महसूली शाखेतील विविध प्रधान/उप प्रधान शीर्षाच्या "वसूल न होणारे कर्ज-निर्लेखन" या गौण शीर्षाखाली खालीलप्रमाणे नवीन उप शीर्ष उघडण्यास शासन मंजुरी देत आहे :-

गौणशीर्ष - वसूल न होणारे कर्ज - निर्लेखन.

[नवीन] उपशीर्ष - शासकीय कर्मचा-यांच्या घरबांधणी अग्रीमाचे निर्लेखन.

व्यक्तिगत शासकीय कर्मचा-यांना " ७६६, शासकीय नोकरांना कर्जे" या प्रधान शीर्षाखाली कर्जे दिली जातात. तेव्हा-७६६-शासकीय कर्मचा-यांना कर्जे [जमा]" या प्रधानशीर्षाखाली समान प्रतिनोंद घेण्यात यावी.

३. शासकीय अथवा जिल्हा परिषद कर्मचा-यांच्या सहकारी गृहनिर्माण संस्थांना मंजूर केलेल्या कर्जाबाबत रकमा " २९८ सहकार/वसूल न होणा-या कर्जाचे निर्लेखन" या प्रधान गौण शीर्षाखालील, "शासकीय अथवा जिल्हा परिषद कर्मचा-यांच्या सहकारी गृहनिर्माण संस्थांना दिलेल्या घरबांधणी अग्रिमाचे निर्लेखन" या

.....२/-

उपशीर्षाखाली निर्लेखित करण्यात आणि " ६९८, सहकारासाठी कर्ज [जमा]" या प्रधान शीर्षाखाली त्याची समान प्रतिनोंद घेण्यात यावी.

४. उक्त कार्यपद्धती, महाराष्ट्र शासन कर्मचारी घरबांधणी अग्रिम नियम, १९६२ खाली मंजूर झालेल्या घरबांधणी अग्रिमाच्या मुद्दलाचे निर्लेखन करावयाचे असल्यास, अनुसरण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ द.म.खानोरकर ]
शासनाचे उप सचिव.

Housing Building Advances - Waiving of recovery of outstanding balance amount granted to Government servants who die while in Service- accounting procedure in respect of --

GOVERNMENT OF MAHARASHTRA
Finance Department,
Resolution No. HBA-1082/CR-454/GEN-5,
Mantralaya, Bombay-400 032, Dated the 4th June 1983.

## RESOLUTION.

According to the orders issued under Government Resolution, Finance Department, No. HBA-1076/CR-765/GEN-5, dated the 5th February 1981, the recovery of the principal of the House Building Advance, granted to a Government servant under the Maharashtra Government Servants' House Building Advance Rules, 19 1962 and under the "Scheme for grant of financial assistance to Cooperative Housing Societies of Maharashtra State Government Employees" should be adjusted against the Death-cum-Retirement Gratuity payable under the rules in the event of his premature death, while in service. Even, after such an adjustment if a balance is outstanding, an amount upto Rs.25,000/- should be waived by the concerned Administrative Department and further outstanding balance, if any, should be waived in consultation with the Finance Department.

2. A question has been raised as to how the accounting adjustments should be carried out in case the amount of principal is waived according to the above orders. It has been decided that the amounts should be written off from accounts by taking contra-credits in Government accounts. Government is accordingly pleased to accord sanction to the opening of the following new sub-head under the minor head "Irrecoverable Loans-Written off" under the various Major/Sub-major heads in the Revenue Section to which the pay and allowances of the individual Government servants are debited.

Minor Head- "Irrecoverable Loans written off"

(New) Sub-head- "Write off of House Building Advances of Government servants"

Since the individual Government servants are given loans under

the major head "766-Loans to Government Servants", an equal contra-credit should be given under the Major head "766-Loans to Government Servants(Receipt)".

3. In respect of the advances granted to Cooperative Housing Societies of Government or Zilla Parishad Employees the amounts should be written off under the sub-head viz "Write off of House Building Advances to Cooperative Housing Societies of Government or Zilla Parishad Employees" under the Major/Minor head "248, Cooperation/Irrecoverable loans written off". Equal contra-credit should be given under the Major head "698-Loans for Cooperation(Receipts)".

4. The above procedure should be followed in cases of writing off of principal of House Building Advance sanctioned under the Maharashtra Government Servants' House Building Advance Rules, 1962.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

D.M. KHANORKAR,
Deputy Secretary to Government.